महाराष्ट्र हब (एम-हब) इमारतीचे बांधकाम
<u>करण्याकरीता निधी वितरीत करणेबाबत.</u>
(सन २०२३-२४)

**महाराष्ट्र शासन**
**शासन निर्णय क्र.मातंधो-२०२४/प्र.क्र.५०/उद्योग-२**
**उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- २७ मार्च, २०२४

<u>वाचा</u> :-१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्रमांक मऔधो २०१९/ प्र.क्र.०६/ उद्योग-२, दिनांक ०७ मार्च, २०१९
२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक आयटीपी २०२१/प्र.क्र१७०/उद्योग- २, दिनांक २७ जून, २०२३
३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्रमांक मातंधो २०२३/प्र.क्र २०७/उद्योग- २, दिनांक ०२/०१/२०२४

<u>प्रस्तावना:-</u>

माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३ यांस मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ३०/०५/२०२३ रोजी झालेल्या बैठकीत मंत्रीमंडळाने मान्यता दिली असून, दिनांक २७/०६/२०२३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्याचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३ जाहीर करण्यात आले आहे.

२. दिनांक २७/०६/२०२३ च्या धोरणानुसार “एम-हब” ची उभारणी व व्हेंचर कॅपिटल फंड करीता धोरण कालावधीत रु. ५०० कोटी एवढा निधी उपलब्ध करुन देण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला असून, सदर निधीमधून राज्य शिखर संस्था एम-हब हे कळंबोली, जि. रायगड येथे महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळाच्या जागेवर विकसित करण्यात येणार असल्याची तरतूद करण्यात आली आहे. सदर जागा ही सिडकोने महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळास भाडेतत्वावर दिली आहे. एम-हब हे उद्योजकतेला प्रोत्साहन देण्यासाठी राज्य शिखर संस्था म्हणून काम करणार आहे. सदर इमारतीचे बांधकाम हे महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत करण्यात येणार आहे. सद्य:स्थितीत इमारतीचे बांधकाम करण्याकरीता आर्थिक वर्ष २०२३-२४ च्या विधानमंडळाच्या हिवाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे रु. ५ कोटी इतका अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर धोरणांतर्गत सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र हब (एम-हब) इमारतीचे बांधकाम करण्याकरीता निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय :-</u>

माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण -२०२३ अंतर्गत एम-हब इमारतीच्या बांधकामाकरीता सन २०२३-२४ या चालू आर्थिक वर्षात बिडीएस प्रणालीवर उपलब्ध अर्थसंकल्पिय तरतूद रुपये ५.०० कोटी ( अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) एवढी रक्कम विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांचे कार्यालयाकडे वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय यांचे कार्यालयातील लेखाधिकारी यांनी सदर निधी आहरीत करुन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ या कार्यान्वयन यंत्रणेकडे सुपूर्द करावा.

३. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई यांना कळविण्यात येते की, सदर रकमेचा धनादेश “मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई” यांचे नावे काढून त्यांना अदा करण्यात यावा.

४. प्रस्तुत प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र.के-१०, मुख्य लेखाशिर्ष - "४८७५, इतर उद्योगावरील भांडवली खर्च ", उपलेखाशिर्ष ६०-इतर उद्योग, गौणशीर्ष-१९०, सार्वजनिक क्षेत्रातील गुंतवणूका, गटशीर्ष ००, उप गटशीर्ष ००(०१) एम-हब इमारतीचे बांधकाम (कार्यक्रम) (४८७५००५२), ५३-मोठी बांधकामे या लेखाशीर्षामधून चालू आर्थिक वर्षात उपलब्ध तरतूदीमधून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आलेल्या तरतूदीनुसार तसेच वित्त विभागाकडील अनौपचारीक संदर्भ २७/२०२४/व्यय-१६,दि.०१/०२/२०२४ नुसार प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०३२७१५०६०६९३१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

SANJAY SHAMKANT DEGAONKAR

Digitally signed by SANJAY SHAMKANT DEGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=56CF8C8577584ADC42F070185C585C41084CC34F6683553D21CCACBFA33D4D1F, cn=SANJAY SHAMKANT DEGAONKAR
Date: 2024.03.28 14:24:32 +05'30'

**( संजय देगांवकर )**
**सह सचिव (उद्योग), महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) मुंबई.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), नागपूर.
३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
५) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
७) मुख्य अभियंता, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
८) मुख्य लेखाधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई.
९) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४ /व्यय-१६), मंत्रालय ,मुंबई.
१०) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय ,मुंबई.
११) अवर सचिव (प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग ,मंत्रालय ,मुंबई.
१२) निवडनस्ती (उद्योग-२)